**अधीक्षक, गट-क संवर्गातून विशेष अधीक्षक, गट-ब संवर्गात देण्यात आलेली पदोन्नती रद्द करणेबाबत श्री. श्यामगौडा रामगौडा पाटील**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन आदेश क्रमांक: पीओजी-२०२४/प्र.क्र.२४३/सेवा-२**
मंत्रालय, मुंबई- ४०००३२
दिनांक : २०/०२/२०२५

**वाचा** –

१.सार्वजनिक बांधकाम विभाग, शासन आदेश क्रमांक- पीओजी-२०२४/प्र.क्र.२४३/सेवा-२ दि. १४/१०/२०२४

२. सार्वजनिक बांधकाम विभाग, शासन ज्ञापन क्र. पीओजी-२०२४/प्र.क्र.२४३/सेवा-२ दि. १३/१२/२०२४

३. सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र. एसआरव्ही २०१५/प्र.क्र.३०३/का.१२, दि. १२/०९/२०१६

**शासन आदेश**

उपरोक्त संदर्भ क्र. १ येथील दिनांक १४/१०/२०२४ च्या आदेशान्वये श्री. श्यामगौडा रामगौडा पाटील यांना सन २०२३-२४ च्या निवडसूचीतून अधीक्षक, गट-'क' संवर्गातून विशेष अधीक्षक, गट-ब पदावर पदोन्नती देऊन त्यांची पदोन्नती उपरांत पदस्थापना मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग कार्यालय, मुंबई येथील विशेष अधीक्षक पदावर करण्यात आलेली होती.

**२.** सदर पदोन्नती आदेशामध्ये जे अधिकारी पदोन्नती नाकारतील त्यांच्याबाबतीत सामान्य प्रशासन विभागाच्या दि. १२/०९/२०१६ शासन निर्णयनुसार कार्यवाही करण्यात येईल, असे नमूद करण्यात आले होते. तसेच, सदरहू पदोन्नती आदेशान्वये संबंधीत वरीष्ठ अधिकारी यांना त्यांच्याकडे नियुक्त असलेल्या अधीक्षक, गट-क यांना पदोन्नतीच्या आदेशानुसार तात्काळ कार्यमुक्त करण्याबाबत व नवीन नियुक्तीच्या ठिकणी कमीतकमी पदग्रहण अवधी घेऊन रजेवर न जाता रुजू होण्याचे आदेश देण्याबाबत कळविण्यात आले होते.

**३.** श्री. पाटील हे पदोन्नतीच्या पदावर विहीत मुदतीत रूजू न झाल्याने त्यांना संदर्भ क्र. २ येथील दि. १३/१२/२०२४ रोजीच्या शासन ज्ञापनान्वये सात दिवसांच्या आत पदोन्नतीच्या पदावर रूजू होण्याबाबत अंतिमत: सूचना देण्यात आल्या होत्या. तद्नंतर देखील श्री. पाटील हे पदोन्नतीच्या पदावर रूजू झालेले नाहीत.

**४.** पूर्व पृष्ठावरील नमूद बाबींवरून श्री. पाटील यांना पदोन्नतीमध्ये स्वारस्य नाही, असे दिसून येते. यास्तव, संदर्भ क्र. ३ येथील सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय दि. १२/०९/२०१६ मधील तरतुदींनुसार व सक्षम प्राधिका-यांच्या मान्यतेने श्री. श्यामगौडा रामगौडा पाटील यांना संदर्भ क्र. १ येथील दि. १४/१०/२०२४ रोजीच्या शासन आदेशान्वये विशेष अधीक्षक, गट-ब या पदावर देण्यात आलेली पदोन्नती या आदेशान्वये रद्द करण्यात येत आहे.त्यामुळे श्री. पाटील हे अधीक्षक (गट-क) या पदावर कायम राहतील.

**५.** श्री. पाटील यांचे नाव विशेष अधीक्षक (गट-ब) या संवर्गाच्या सन २०२३-२४ च्या निवडसूचीतून वगळण्यात येत असून पुढील दोन वर्षी होणा-या निवडसूच्यांमध्ये त्यांच्या नावाचा विचार न करता ते सेवेत असल्यास तिस-या वर्षाच्या निवडसूचीत त्यांची पदोन्नतीसाठीची पात्रता तपासण्यात येईल.

**६.** तसेच, श्री. पाटील यांची विशेष अधीक्षक, गट-ब पदावरील पदोन्नती रद्द करण्यात येत असल्याने त्यांना आश्वासित प्रगती योजने अंतर्गत लाभ दिले गेले असल्यास ते काढून घेण्यासंदर्भात वित्त विभागाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या आदेशानुसार कार्यवाही करावी.

**७.** सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०२२०१३५०४३६११८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

RAVINDRA GURUPAD BASARGI

Digitally signed by RAVINDRA GURUPAD BASARGI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC WORKS DEPARTMENT, 2.5.4.20=42c03dde41273e25131b8d69bcecc5531af7bb76bbf0205026064afaa3a74eba, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=3227C5F906295586ED2C6128198ED848B1709F38F19B29C695719FBB4FF19717, cn=RAVINDRA GURUPAD BASARGI
Date: 2025.02.20 13:51:38 +05'30'

**(रविंद्र गु. बसर्गी)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता / लेखापरीक्षा) महाराष्ट्र राज्य, मुंबई
२. सर्व मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग,
३. संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी
४. मा.मंत्री (सा.बां)(सा.उ.वगळून) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई
५. मा. राज्यमंत्री (सा. बां.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय मुंबई
६. अपर मुख्य सचिव (सा.बां.) यांचे स्वीय सहाय्यक, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. अपर मुख्य सचिव, सामान्य प्रशासन विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
८. सचिव (रस्ते) / सचिव (बांधकामे) यांचे स्वीय सहाय्यक, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. श्री.श्यामगौडा रामगौडा पाटील यांना संबंधीत मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग यांचेमार्फत
१०. कार्यासन आस्था-१ / आस्था-३/ सेवा-३/सेवा-४, सार्वजनिक बांधकाम विभाग,मंत्रालय,मुंबई.
११. कार्यासन सेवा-२ (निवडनस्ती) सार्वजनिक बांधकाम विभाग,मंत्रालय,मुंबई.